अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेतील वरिष्ठ लिपीक, लघुटंकलेखक, लिपिक टंकलेखक व वाहनचालक या संवर्गातील कर्मचाऱ्यांकरीता अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कौविउ-२०१९/प्र.क्र.१०५/प्रशा-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २२ जानेवारी, २०२०

**संदर्भ :** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१.१२.२०१९

**प्रस्तावना -**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दिनांक २१.१२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करणे, तसेच उक्त अनुसूचित जमातीच्या पदावर नियुक्त झालेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांची रिक्त होणारी पदे भरण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगास मागणीपत्र पाठविणे याबाबत सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेतील वरिष्ठ लिपीक, लघुटंकलेखक, लिपिक टंकलेखक व वाहनचालक यांच्याकरीता ७ अधिसंख्य पदे संबंधित कार्यालयांच्या आस्थापनेवर निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय-**

अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या, अन्य मागासवर्ग जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या, जातवैधता प्रमाणपत्राबाबत न्यायालयीन प्रकरणे प्रलंबित असलेल्या तसेच जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्याने सेवा समाप्त केलेल्या अधिकारी/कर्मचारी यांना पुनर्नियुक्ती देण्यासाठी कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेतील वरिष्ठ लिपीक, लघुटंकलेखक, लिपिक टंकलेखक व वाहनचालक यांच्याकरीता खालीलप्रमाणे त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या कार्यालयांमध्ये या शासन निर्णयान्वये ७ अधिसंख्य पदे निर्माण करण्यात येत आहेत-

| अ.क्र. | अधिकारी/कर्मचाऱ्याचे नाव व पदनाम | कार्यालय |
|---|---|---|
| १. | श्री.अ.बा.सुर्यवंशी, वरिष्ठ लिपिक | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्ग. केंद्र, सातारा |
| २. | श्री.हरिसिंग सि.सक्करवार, वाहनचालक | विभागीय आयुक्तालय, नागपूर |
| ३. | श्री.उमेश चिं.पराते, लघुटंकलेखक | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्ग. केंद्र, जळगांव |
| ४. | श्रीमती सु.सु.तुरबाडकर, लिपिक-टंकलेखक | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्ग. केंद्र, मुंबई शहर |
| ५. | श्री.य.प.खडगी, लिपिक-टंलेखक | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्ग. केंद्र, नागपूर |
| ६. | श्री.ज्ञा.ह.पराते, लिपिक-टंकलेखक | आदिवासी उमेदवारांकरीता कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्ग. केंद्र, देवरी, जि.गोंदिया |
| ७. | श्री.इंदलसिंग पु. गुसिंगे, लिपिक-टंकलेखक | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्ग. केंद्र, मुंबई उपनगर |

२. उपरोक्त अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणारे कर्मचारी त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या कार्यालयात सध्या ज्या पदावर कार्यरत आहेत त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत असून, दिनांक ३१.१२.२०१९ पासून तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरीता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यत सदर कर्मचारी यांच्याकरीता सदर अधिसंख्य पद अस्तित्त्वात राहील.

३. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, महाराष्ट्र राज्य यांना सूचित करण्यात येते की, उपरोक्त तक्त्यातील अ.क्र.१ येथील श्री.अ.बा.सुर्यवंशी यांचे वरिष्ठ लिपिक हे पद अधिसंख्य म्हणून वर्ग केल्याने रिक्त झालेले वरिष्ठ लिपिकाचे पद पदोन्नतीने अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र धारक उमेवारांमधून भरणे आवश्यक राहील. तथापि पदोन्नतीतील आरक्षणाची बाब सर्वोच्च न्यायालयामध्ये प्रलंबित आहे. त्यामुळे याबाबत अंतिम निर्णय झाल्यानंतर तसेच, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेचा सुधारित आकृतीबंध निश्चित झाल्यानंतरच पदांची संख्या लक्षात घेवून पदभरतीची कार्यवाही करण्यात यावी.

अ.क्र. २ येथील श्री.एस. एस.सक्करवार, वाहनचालक यांचे यांच्या सेवा अधिसंख्य म्हणून वर्ग झाल्यामुळे त्यांचे रिक्त झालेले वाहनचालकाचे पद सरळसेवेने अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र धारक उमेवारांमधून भरणे आवश्यक राहील. तथापि, सदरची कार्यवाही कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेचा सुधारित आकृतीबंध निश्चित झाल्यानंतरच पदांची संख्या लक्षात घेवून करण्यात यावी.

अ.क्र.३ येथील श्री.उ.चिं.पराते, लघुटंकलेखक, यांची सेवा अधिसंख्य म्हणून वर्ग झाल्यामुळे रिक्त झालेले लघुटंकलेखकाचे पद सरळसेवेने भरणे आवश्यक राहील. सदरची कार्यवाही कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेचा सुधारित आकृतीबंध निश्चित झाल्यानंतरच लिपिक-टंकलेखकांची अनुसूचित जमाती प्रवर्गातील पदांची संख्या लक्षात घेवून करण्यात यावी.

अ.क्र.४ ते ६ येथील श्रीमती सु.सु. तुरबाडकर,लि.टं. श्री.य.प.खडगी, लि.टं. व श्री.डि.एच.पराते, लि.टं या कर्मचाऱ्यांची अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्रे अवैध ठरली असून सा.प्र.वि.ने वेळोवळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार त्यांच्या संरक्षित करुन त्यांना वि.मा.प्र. प्रवर्गात दर्शविण्यात आले होते. यामुळे अनुसूचित जमातीची रिक्त झालेली लिपिक-टंकलेखकांची पदे सन २०१४ च्या सरळसेवा भरतीने भरण्यात आली आहेत. आता या कर्मचाऱ्यांच्या सेवा अधिसंख्य म्हणून वर्ग केल्यामुळे या प्रकरणी सेवाभरतीची कार्यवाही करण्याची आवश्यकता नाही.

अ.क्र. ७ येथील श्री.इंदलसिंग पु. गुसिंगे, लि.टं. यांच्या सेवा अधिसंख्य म्हणून वर्ग केल्यानंतर रिक्त झालेले लिपिक टंकलेखकाचे पद सरळसेवेने अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र धारक उमेवारांमधून भरणे आवश्यक आहे. सदरची कार्यवाही कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेचा सुधारित आकृतीबंध निश्चित झाल्यानंतरच लिपिक-टंकलेखकांची अनुसूचित जमाती प्रवर्गातील पदांची संख्या लक्षात घेवून करण्यात यावी.

४. या आदेशान्वये निर्माण केलेल्या अधिसंख्य पदावर नियुक्ती देण्याबाबतचे आदेश आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यांनी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक २१.१२.२०१९ नुसार तात्काळ निर्गमित करावेत व त्याची प्रत शासनास तात्काळ सादर करावी.

५. अधिसंख्य पदांच्या वेतनावर होणारा खर्च हा संबंधित कार्यालयाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१.१२.२०१९ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार, तसेच वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१७/आपुक, दिनांक १६.०१.२०२० अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या सकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२२१६५२३६७४०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

Sangeeta Ajit Shinde

Digitally signed by Sangeeta Ajit Shinde
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Skill Development and Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ba607066e7a34e428b7c7c73de0f7e09a315a2af5075fd47f1e08389aa137b81, cn=Sangeeta Ajit Shinde
Date: 2020.01.23 16:02:19 +05'30'

**(संगीता शिंदे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर

२) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
३) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, महाराष्ट्र राज्य
४) सर्व उप आयुक्त/सर्व संबंधित सहायक आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता
५) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
६) सामान्य प्रशासन विभाग ( कार्यासन १६-ब)
७) वित्त विभाग (कार्यासन आ.पु.क.)
८) सर्व कार्यासने, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग
९) निवड नस्ती (प्रशा-२)